**अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या स्वयंसहाय्यता बचत गटांना मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांचा पुरवठा करणे या योजनेंतर्गत सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरित करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसटीएस-२०१५ /प्र.क्र. १०२ /अजाक-१**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०३ सप्टेंबर, २०१५

वाचा

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. एसटीएस-२०११ /प्र.क्र. ४३९/ अजाक-१,दिनांक ६/१२/२०१२

२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. एसटीएस-२०११ /प्र.क्र. ४३९/ अजाक-१,दिनांक ६/२/२०१३

३) शासन परीपत्रक वित्त विभाग क्र. अर्थस/२०१५/प्र.क्र. ८५/ अर्थ-३, दिनांक १७/४/२०१५

४ ) आयुक्त,समाजकल्याण, पुणे यांचे पत्र क्र.सकआ/अजाउयो-१/मिनी ट्रॅक्टर/२०१५-१६/का-१४/८४७, दिनांक २४/८/२०१५

**प्रस्तावना**

शासन निर्णय, दिनांक ६/१२/२०१२ अन्वये अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील स्वयंसहाय्यता बचत गटांना ९० टक्के अनुदानावर मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने पुरवठा करण्याची योजना सन २०१२-१३ या वित्तीय वर्षापासून राबविण्यात येत आहे. या योजनेकरिता सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षात रु. ६०००.०० लाख एवढी अर्थसंकल्पिय तरतूद मंजूर करण्यात आली आहे. सदर योजने अंतर्गत संदर्भाधिन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जाती व नवबौध्द घटकाच्या स्वयंसहाय्यता बचत गटांना ९०% अनुदानावर ९ ते १८ अश्वशक्तीचा मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने कल्टिव्हेटर किंवा रोटॅव्हेटर व ट्रेलर यांचा पुरवठा करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. या योजनेंतर्गत पुरवठा करावयाचा मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांच्या खरेदीची कमाल किंमत रु.३.५० लाख इतकी ठेवण्यात आली आहे. सन २०१२-१३, २०१३-१४ व २०१४-१५ या आर्थिक वर्षात मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांची खरेदी महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ मर्या. मुंबई या शासन अंगीकृत संस्थेकडून करण्यात आली होती. सन २०१२-१३ मध्ये निश्चित केलेल्या दरामध्ये व योजनेच्या अटी व शर्तीनुसार ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांचा पुरवठा सन २०१५-१६ मध्ये करण्यास महामंडळाने सहमती दर्शविलेली आहे. सदर २०१५-१६ मध्ये प्राप्त अर्थसंकल्पीय एकुण ६०००.०० लाख तरतूदीपैकी वित्त विभागाच्या क्र. ३ च्या शासन परिपत्रक दि.१७.४.२०१५ मधील परि (४) मध्ये नमुद केल्यानुसार सन २०१५-१६ च्या प्रथम आठमाहि करीता (नोव्हेंबर,२०१५ अखेर) आवश्यक असणारा योजनेतर व योजनांतर्गत अर्थसंकल्पीय निधी एकुण वार्षिक तरतूदीच्या ७०% च्या मर्यादेत म्हणजेच रु.४२.०० कोटी सदर प्रणालीव्दारे (बीम्स) वितरीत केले जाईल असे स्पष्ट करण्यात आले आहे. त्यानुसार सदर योजनेसाठी मंजूर तरतूदीच्या ७०% च्या मर्यादेत भौतीक उद्दीष्ट ठरवुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील स्वयंसहाय्यता बचत गटांना मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने पुरवठा करणे या योजनेसाठी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर केलेली रु.६०.०० कोटी एवढी अर्थसंकल्पीय तरतूद तसेच महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाने दर्शविलेली सहमती

विचारात घेऊन सद्य परिस्थितीत मंजूर तरतुदीपैकी ७०% च्या मर्यादेत म्हणजेच रु.४२.०० कोटी एवढ्या तरतुदीबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

अ) सन २०१५-१६ या वर्षात मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधनांची खरेदी महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाकडून करण्यात यावी.

ब) खरेदी करण्यात येणारे मिनी ट्रॅक्टर व त्याच्या उपसाधनांच्या किंमती पुढीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत:-

| अ.क्र. | साधन | ब्रॅड | किंमत रुपये |
|---|---|---|---|
| १ | मिनी ट्रॅक्टर - युवराज २१५ | महिंद्रा ॲन्ड महिंद्रा | २,४३,६९२/- |
| २ | १.५ टन नॉन टीपींग ट्रेलर | महिंद्रा ॲन्ड महिंद्रा | ५३,९१६/- |
| ३ | ०.८ मी रोटा व्हेटर | महिंद्रा ॲन्ड महिंद्रा | ५२,३९२/- |
| | एकुण | | ३,५०,०००/- |

क) मिनी ट्रॅक्टर व त्यांची उपसाधनांची खरेदी करण्यासाठी आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांना सनियंत्रक व वितरण अधिकारी म्हणुन प्राधिकृत करण्यात येत आहे. आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी ट्रॅक्टर खरेदीच्या अनुदानाची रक्कम अग्रीम म्हणुन महामंडळास अदा करावी.

ड) मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांचे वाटप जिल्हानिहाय सोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे करण्यात यावे.

२. प्रस्तुत संदर्भाधीन क्र.३ च्या वित्त विभागाच्या दिनांक १७/४/२०१५ च्या परीपत्रकान्वये योजनांतर्गत योजनांसाठी मंजूर करण्यात आलेली ७० % रक्कम म्हणजेच रु.४२.०० कोटी या शासन निर्णयान्वये मंजुर करण्यात येत आहे. सदरिल रक्कम अदा करण्यासाठी आयुक्त समाजकल्याण, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करण्यात येत आहे. तसेच देयकावर प्रतीस्वाक्षरी करण्याचे अधिकारही त्यांना किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिका-यास देण्यात येत आहेत. आयुक्त समाजकल्याण, पुणे यांनी ट्रॅक्टर खरेदीच्या अनुदानाची रक्कम अग्रिम म्हणून महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळास अदा करावी.

३. या बाबींवर होणारा खर्च पुढीलप्रमाणे नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो चालू आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा:-

" २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण
०१ अनुसूचित जातीचे कल्याण
१०२ आर्थिक विकास
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना (वि.घ.यो.)
०४ उपकरणे व यंत्रसामुग्रीसाठी अर्थसहाय्य
(०४) (०१) अनुसूचित जाती व नवबौद्ध घटकांच्या स्वयंसहाय्यता बचत गटांना मिनी ट्रॅक्टर पुरविणे (वि.घ.यो.)
(२२२५ D ३३१)
३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) "

**मागणी क्रमांक एन-३**

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १७/४/२०१५ च्या परीपत्रकान्वये दिलेल्या निर्देशास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०४१५४५४७८७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Amrutrao Zalte

Digitally signed by Siddharth Amrutrao Zalte
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE & SPECIAL ASSISTANCE, postalCode=400032, st=MAHARASHTRA, cn=Siddharth Amrutrao Zalte
Date: 2015.09.04 15:49:01 +05'30'

**( सिध्दार्थ झाल्टे )**
अवर सचिव

**प्रत,**

१. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सर्व प्रादेशिक आयुक्त.
३. सर्व सहाय्यक आयुक्त.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ / २, मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, पुणे.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. नियोजन विभाग (का.१४३१) मंत्रालय,मुंबई
९. वित्त विभाग, (का साउ/अर्थोपाय), (अर्थसंकल्प)मंत्रालय, मुंबई.
१०.कक्ष अधिकारी, (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११.निवड नस्ती का- अजाक-१.

## परिशीष्ट -अ

## शासन निर्णय क्र.एसटीएस-२०१५/प्र.क्र.१०२/अजाक-१ दि. २ सप्टेंबर,२०१५ च्या सोबतचे परिशीष्ट-अ

| अ.क्र. | जिल्हा | वितरीत करावयाच्या रु.४२ कोटी अनुषंगाने वाटपाबाबतचे उद्दीष्ट | अ.क्र. | जिल्हा | वितरीत करावयाच्या रु.४२ कोटी अनुषंगाने वाटपाबाबतचे उद्दीष्ट |
|---|---|---|---|---|---|
| १ | नंदुरबार | ५ | १८ | जालना | २९ |
| २ | धुळे | १४ | १९ | औरंगाबाद | ५८ |
| ३ | जळगांव | ४२ | २० | नाशिक | ५९ |
| ४ | बुलढाणा | ५० | २१ | ठाणे | ७८ |
| ५ | अकोला | ३९ | २२ | रायगड | १४ |
| ६ | वाशीम | २५ | २३ | पूणे | १२६ |
| ७ | अमरावती | ५४ | २४ | अहमदनगर | ६१ |
| ८ | वर्धा | २० | २५ | बीड | ३८ |
| ९ | नागपूर | ९३ | २६ | लातूर | ५१ |
| १० | भंडारा | २१ | २७ | उस्मानाबाद | २८ |
| ११ | गोंदीया | १९ | २८ | सोलापूर | ६९ |
| १२ | गडचिरोली | १३ | २९ | सातारा | ३५ |
| १३ | चंद्रपूर | ३७ | ३० | रत्नागिरी | ७ |
| १४ | यवतमाळ | ३५ | ३१ | सिंधूदूर्ग | ६ |
| १५ | नांदेड | ६८ | ३२ | कोल्हापूर | ५४ |
| १६ | हिंगोली | २० | ३३ | सांगली | ३९ |
| १७ | परभणी | २६ | | एकुण | १३३३ |